लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्याकडून प्राप्त होणा-या पत्रव्यवहारावर अग्रक्रमाने कार्यवाही करण्याबाबत.

संगणक सांकेतांक २०१७०५०३१२२२१०५९०७.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक एलपीएल 1595/प्रकरण क्रमांक 90/95/पंधरा,

मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 26 ऑक्टोबर 1995.

वाचा:- (1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एलपीएल 1293/प्र.क्र.11/93/अकरा, दिनांक 31 मार्च 1993.

(2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एलपीएल/प्र.क्र.92-93/11, दिनांक 19 नोव्हेंबर 1993.

(3) शासन परिपत्रक, क्रमांक एलपीएल 1194/264/पंधरा, दिनांक 13 मे 1994.

शासन परिपत्रक:- महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त अधिनियम, 1971 अन्वये लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त यांच्या कामकाजाला विधी मंडळीय तातडीच्या किंवा कालबध्द पध्दतीने प्रतिसादर देणे अपेक्षित आहे. परंतु सामान्य प्रशासन विभागाने या संदर्भात उपरोक्त आदेशान्वये व त्यापूर्वी काढलेल्या आदेशान्वये दिलेल्या सूचनांकडे अगदी परिपाठी पध्दतीने पाहिले जाते. परिणामी लोक आयुक्त किंवा उप लोक आयुक्त यांचेकडे दाखल झालेल्या तक्रारीच्या/अभिकथनामध्ये खालील त्रुटीमुळे निपटारा होत नाही व त्याचा उल्लेख लोक आयुक्त कार्यालयाच्या वार्षिक अहवालावर सातत्याने केला जातो ही खेदाची बाब आहे.

(1) लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचेकडे पाठविण्यात येणारे अहवाल स्वयंस्पष्ट नसतात त्यातील अभिप्राय परिपाठी स्वरुपाचे असतात.

(2) लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचेकडे विहित मुदतींत मागविलेले अभिप्राय वेळेवर उपलब्ध केले जात नाहीत तर स्मरणपत्रेहि पाठवून पत्रव्यवहाराला उत्तरे मिळत नाहीत. ही परिस्थिती क्षेत्रीय अधिकारी तसेच मंत्रालय स्तरावरही आढळते ही वस्तुस्थिती लोक आयुक्त कार्यालयाने वेळोवेळी निदर्शनास आणलेली आहे.

(3) लोक आयुक्त यांचेकडे करण्यात येणारा पत्रव्यवहार कशा पध्दतीने करावयाचा याबाबत उपरोक्त दिनांक 13 मे 1994 च्या आदेशांचे अनुपालन होत नाही.

(4) महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त अधिनियम, 1971 च्या कलम 12 (2) व कलम 12(4) मध्ये लोक आयुक्त किंवा उप लोक आयुक्त यांचेकडून आलेल्या शिफारसी संबंधीच्या अहवालावर कार्यवाही करण्यासंबंधीचे अधिनियमातील कालमर्यादेचे उल्लंघन होत असते.

(5) महाराष्ट्र लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त अधिनियम, 1971 मधील 12 (5) अन्वये प्रस्तुत करण्यात येणा-या विशेष अहवालावरील अभिप्राय काळजीपूर्वक तयार करुन त्याबाबतचे स्पष्टीकरणात्मक ज्ञापन तसेच कलम 12 (6) अन्वये सादर झालेल्या एकत्रित वार्षिक अहवालामधील विभागाच्या संबंधीत उपस्थित बाबींसंबंधीचे अभिप्रायांचे काळजीपूर्वक परीक्षण करुन त्यावरील अभिप्राय सामान्य प्रशासन विभागाकडे तातडीने पाठविले जात नाही. परिणामी कलम 12 (7) अन्वये विधी मंडळाच्या दोन्ही सभागृहापुढे सदर अहवाल स्पष्टीकरणात्मक ज्ञापनासह प्रस्तुत करण्यास विलंब होतो.

(कृ.मा.प.)

शामुमु-रोटा-साप्रवि-एच-1187(3,700-11-95)

(6) लोक आयुक्त किंवा उप लोक आयुक्त यांचेकडे सुनावणीच्या वेळी लोक आयुक्त कार्यालयाकडून आमंत्रित केलेले संबंधीत अधिकारी किंवा विभाग प्रमुख उपस्थित न रहाता विषयाशी अपरिचित अशा कनिष्ठ अधिका-याला/कर्मचा-याला पाठविण्यात येते. परिणामी लोक आयुक्त/उप लोक आयुक्त यांचेमार्फत करण्यात येणारे अन्वेषण सविस्तर तपशीलाअभावी लांबते जाते. तसेच आमंत्रित अधिका-याने स्वत: उपस्थित न राहिल्यामुळे महत्वाच्या व गुंतागुंतीच्या क्लीष्ट प्रकरणांचा सविस्तर तपशील प्रस्तुत करण्याबाबत त्रुटी रहाते.

(7) महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त अधिनियम, 1971 मधील कलम 11 च्या तरतुदी पाहिल्यास असे आढळून येईल की, लोक आयुक्त/उप लोक आयुक्त हे दिवाणी प्रक्रीया संहिता 1908 मधील तरतुदींचा अवलंब करुन कोणत्याही व्यक्तीस त्यांच्यासमोर उपस्थित रहाण्यास ते भाग पाडू शकतात. ही बाब लक्षात घेऊन विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख या स्तरावरील अधिका-यासह संबंधीत अधिका-याने लोक आयुक्त यांच्या सुनावणीच्या वेळी उपस्थित रहाणे उचित होईल. एखादेवळी वरिष्ठ पातळीवरील अधिका-यांना सुनावणीचा दिनांक सोयीचा नसल्यास लोक आयुक्त किंवा उप लोक आयुक्त यांचेकडून उपस्थिती माफ करुन घ्यावी किंवा सुनावणीचा दिनांक बदलून घेतल्यास प्रशासनाच्या दृष्टीने ते सुलभ होईल. परंतु प्रशासकीय कामकाजामुळे व प्रशासकीय कारणीभूत बाबी व्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रसंगी सुनावणी टाळण्यात येणार नाही हे पाहणे अत्यावश्यक आहे. जेणेकरुन लोक आयुक्त व प्रशासन यांचेमधील समन्वय परिणामकारक होऊन त्याची परिणामकता अनुभवास येईल.

सर्व मंत्रालयीन विभाग, विभाग प्रमुख तसेच कार्यालय प्रमुख यांना असे सूचित करण्यात येते की, त्यांनी उपरोक्त कार्यपध्दती काटेकोरपणे अंमलात आणली जाईल याची दक्षता घ्यावी.

ज्या अधिका-यांकडून किंवा कर्मचा-यांकडून याबाबत निष्काळजीपणा केला जाईल किंवा कालमर्यादेचे उल्लंघन केले जाईल त्या प्रत्येक वेळी संबंधीत शासकीय सेवकाच्या गोपनीय अहवालामध्ये सदर त्रुटीची नोंद घ्यावी.

हे परिपत्रक सर्व कर्मचारी व अधिकारी यांचया दृष्टोत्पत्तीस आणावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

के.सी. श्रीवास्तव,
शासनाचे प्रधान सचिव (सेवा),
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मा. मुख्य मंत्री यांचे सचिव, मुंबई,
मा. उप मुख्य मंत्री यांचे सचिव, मुंबई,
शासनाचे मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग,
शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव,
शासनाचे सर्व प्रधान सचिव/सचिव,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

एच-1187(3,700-11-95)-अ